**१% मुद्रांक शुल्क अधिभारामुळे जमा होणाऱ्या रकमा संबंधित महानगरपालिकांना वितरीत करण्याबाबत.**
**सन २०२१-२२ मधील दुसरा हप्ता..**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- मुद्रांक-२०२०/प्र.क्र.१३/नवि-३२,**
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक: १७ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा :-**

(१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून,२०२१.
(२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि. ०६ एप्रिल, २०२१.
(३) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. मुद्रांक-२०२०/प्र.क्र.१३/नवि-३२, दि.३१.१२.२०२१.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम (१९४९ चा ५९) याच्या कलम १४९ अ मध्ये सुधारणा करण्यात आली असून यामध्ये महाराष्ट्र मुद्रांक अधिनियम (१९५८ चा ६०), या अन्वये स्थावर मालमत्तेची अनुक्रमे विक्री, देणगी व फलोपभोग गहाण यासंबंधी संलेखांवर बसवावयाच्या मुद्रांक शुल्कात, जर असा कोणताही संलेख हा, शहरात स्थित असलेल्या स्थावर मालमत्तेच्या संबंधातील असेल तेव्हा, विक्री किंवा देणगीसंबंधीच्या संलेखाच्या बाबतीत, अशा स्थित असलेल्या मालमत्तेच्या मूल्यावर, आणि फलोपभोग गहाणासंबंधीच्या बाबतीत, संलेखात मांडण्यात आलेल्या त्या संलेखाद्वारे प्रतिभूत केलेल्या रकमेवर, एक टक्का या दराने अधिभार आकारण्यात येतो. या अनुषंगाने सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात राज्यातील २६ महानगरपालिकांना देय असलेली १% मुद्रांक शुल्क अधिभारामुळे जमा होणाऱ्या रक्कमेपैकी रु. २३५,७१,९८,८०९/- इतक्या रकमेचा पहिला हप्ता शासन निर्णय क्र. मुद्रांक-२०२०/प्र.क्र.१३/नवि-३२, दि.३१.१२.२०२१ अन्वये वितरीत करण्यात आला आहे. आता रू. २१०,००,००,०००/- इतक्या रकमेचा दुसरा हप्ता महानगरपालिकांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१% मुद्रांक शुल्कापोटी सन २०२१-२२ मधील दुसरा हप्ता वितरीत करण्याकरीता अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध अनुदानाच्या मर्यादेत महानगरपालिकांना एकुण रक्कम रु.२१०,००,००,००० (अक्षरी रूपये दोनशे दहा कोटी मात्र) खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे:-

## सन २०२१-२२ करीता २६ महानगरपालिकांना १% मुद्रांक शुल्कापोटी वितरीत करावयाचे अनुदान

| अ.क्र. | महानगरपालिकांचे नाव | सन २०२१-२२ मधील दुसरा हप्ता |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | नागपूर | ७,७५,८२,३७४ |
| २ | चंद्रपूर | ३३,४०,७७१ |
| ३ | अमरावती | १,९१,१६,१४१ |
| ४ | अकोला | १,५२,४५,६७० |
| ५ | औरंगाबाद | ४,८६,२७,७१५ |
| ६ | परभणी | २२,६९,५०२ |
| ७ | लातूर | ६१,०३,९२३ |
| ८ | नांदेड-वाघाळा | १,१८,२४,८३५ |
| ९ | नाशिक | १०,४०,१९,४३३ |
| १० | मालेगाव | ५८,३३,७७१ |
| ११ | धुळे | ७६,२६,८१९ |
| १२ | जळगाव | १,१०,८७,५४५ |
| १३ | अहमदनगर | १,६४,६८,५५७ |
| १४ | पुणे | ६९,००,३०,६३१ |
| १५ | पिंपरी-चिंचवड | २४,९७,९८,१३६ |
| १६ | कोल्हापूर | ९३,८१,१३६ |
| १७ | सोलापूर | १,०९,९९,६३० |
| १८ | सांगली | १,३३,२६,४१९ |
| १९ | मिरा भाईंदर | ८,३९,०८,२२३ |
| २० | वसई-विरार | ७,७४,४४,२८७ |
| २१ | भिवंडी-निजामपूर | १,५२,५३,९३४ |
| २२ | उल्हासनगर | ७९,६८,१३५ |
| २३ | कल्याण-डोंबिवली | १९,५५,१२,८५० |
| २४ | ठाणे | २४,२६,२८,५७४ |
| २५ | नवी मुंबई | १०,०९,५१,२२२ |
| २६ | पनवेल | ७,३६,४९,७६७ |
| एकुण:- | | २१०,००,००,००० |

०२. सदर अनुदान उपरोल्लेखित महानगरपालिकांना वितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. **जिल्हाधिकारी यांनी मनपांना देय असलेल्या रकमेमधून कोणत्याही प्रकारची कपात न करता (शासनाने कळविल्याशिवाय) सदर अनुदान आहरण करून संबंधित महानगरपालिकांना १० दिवसांत वितरीत करावे.**

०३. सदर १% अधिभारापोटी जमा रकमेचा तसेच त्यापोटी वितरीत करण्यात येणाऱ्या या सहायक अनुदानावरील खर्चाचा हिशोब संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी स्वतंत्रपणे ठेवावा व याबाबतचे लेखे व तत्संबंधी सर्व कागदपत्रे महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई व महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना, आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन द्यावीत.

०४. याकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक एफ-४, ३६०४, स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, १०२, मुद्रांक शुल्क (०१) जकात रद्द केल्यामुळे मुद्रांक शुल्काचे अभिहस्तांकन (०१)(०१) स्थानिक संस्था करांऐवजी जकातीचे पुन:स्थापन केल्यामुळे महानगरपालिका क्षेत्रामधील मुद्रांक शुल्कावरील १ टक्के अधिभार महानगरपालिकेसाठी देण्याच्या दृष्टिने (३६०४०९२४) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

०५. प्रमाणित करण्यात येते की, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक ०६ एप्रिल, २०२१ व शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८ /अर्थ-३, दि. २४ जून, २०२१ मधील सर्व अटी व शर्तींची पूर्तता होत आहे. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक. ३६/व्यय-३, दिनांक ०३.०२.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०२१७१४४२३५९४२५ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

PANDURANG
JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2022.02.17 14:47:09 +05'30'

**( पां. जो. जाधव )**
**सहसचिव**
**नगर विकास विभाग**

**प्रति,**

१. संबंधित जिल्हाधिकारी.

२. आयुक्त संबंधित महानगरपालिका.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (मुंबई/नागपूर).
४. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६. संबंधित जिल्ह्याचे जिल्हा कोषागार अधिकारी.
७. नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य पुणे.
८. वित्त विभाग व्यय-३/अर्थोपाय/अर्थ-१६, मंत्रालय, मुंबई.
९. मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव.
११. कार्यासन अधिकारी, नगर विकास विभाग (नवि-४), मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (नवि-३२).